तात्काळ आरक्षण सेवा शुल्काची प्रतिपूर्ती- रेल्वे प्रवास

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक प्रवास-२०९९ /प्र.क्र. १०३/९९/सेवा-५,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२, दिनांक :- २ फेब्रुवारी, २०००.

पहा:- १) केंद्र शासनाचे ज्ञापन क्रमांक फ.सं. १९०२३/ १ / ९९ / संस्था IV / भारत सरकार, वित्त मंत्रालय, व्यय विभाग, दिनांक :- १६ ऑगस्ट, १९९९.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक प्रवास -१०९८/प्र.क्र. ७४/९८/सेवा-५, दिनांक ४ डिसेंबर, १९९९

## परिपत्रक

१. वित्त विभागाच्या वरील दिनांक ४ डिसेंबर, १९९९ च्या आदेशान्वये " रेल्वेच्या विशिष्ट गाड्यांसाठी तात्काळ आरक्षण सुविधा आता उपलब्ध झाली आहे. यापुढे अत्यंत तातडीच्या परिस्थितीत कार्यालयीन कामकाजाकरिता केलेल्या प्रवासासाठी आकारल्या जाणा-या तात्काळ आरक्षण शुल्काची प्रतिपूर्ती मुंबई ते दिल्ली , नागपूर व औरंगाबाद हया मार्गावरील प्रवासासाठी अनुज्ञेय राहील." अशी तरतूद करण्यात आलेली आहे.

२. भारतीय रेल्वे प्रशासनाने प्रवासासाठी आरक्षण तावडतोब उपलब्ध व्हावे यासाठी तात्काळ आरक्षण सुविधा सुरु केलेली आहे. केंद्र सरकारने क्रमांक फ. सं. १९०२३/ १/९९/संस्था IV, भारत सरकार , वित्त मंत्रालय, व्यय विभाग, नवी दिल्ली , दिनांक १६ ऑगस्ट, १९९९ च्या कार्यालयीन ज्ञापनान्वये त्यांच्या अधिकारी / कर्मचा-यांना कार्यालयीन कामासाठी अत्यंत तातडीच्या परिस्थितीत या सुविधेचा उपयोग केल्यास त्याच्या खर्चाची प्रतिपूर्ती अनुज्ञेय केली आहे.

३. या बाबींचा साकल्याने विचार करुन शासन आता असे आदेश देत आहे की, शासकीय दौ-याच्या अनुषंगाने उपरोक्त मार्गावरील तात्काळ सेवा या सुविधेचा उपयोग करुन जे अधिकारी / कर्मचारी आरक्षण मिळवतील त्यांना तात्काळ सेवा शुल्काची प्रतिपूर्ती शासनातर्फे करण्यात येईल तथापि याबाबत संबंधित नियंत्रक अधिका-यांनी अशा प्रवासाची निकड प्रमाणित करणे आवश्यक राहील.

४. उपरोक्त सुविधा लक्षात घेता शासन असेही आदेश देत आहे की, शासकीय अधिकारी व इतरांनी कटाक्षाने तात्काळ आरक्षण सेवेचा फायदा घ्यावा व विमान प्रवास टाळावेत.

५. शासन असेही निदेश देत आहे की, तात्काळ आरक्षण सेवेच्या सवलतीच्या परिणामस्वरुप विमान प्रवासांची संख्या उत्तरोत्तर कमी होत आहे किंवा कसे याची पडताळणी करण्यासाठी सर्व प्रशासकीय विभागांनी दर सहा महिन्यांनी याबाबत आढावा घ्यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

श. वि. लागवणकर,
शासनाचे सहसचिव.

प्रति,

महालेखापाल -२ ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , नागपूर,
महालेखापाल-१ ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र मुंबई,
महालेखापाल-१ ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , मुंबई,
महालेखापाल-२ ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र , नागपूर ,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई ,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव ,
उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव ,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
मंत्रालयीन सर्व विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख ,
*प्रबंधक , उच्च न्यायालय ( मूळ शाखा) , मुंबई ,
* प्रबंधक , उच्च न्यायालय ( अपील शाखा ) , मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई ,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय ( व्यय विभाग ) , खोली क्र. २६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
संचालक, लेखा व कोषागारे , मुंबई ,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब , मुंबई / पुणे / नागपूर / /औरंगाबाद / नाशिक / अमरावती.
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी ,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड फाईल, वित्त विभाग / सेवा-५.

* पत्राद्वारे.

एच-1086(20,000+50-2-00).